महाराष्ट्र राज्य सहकारी परिषदेची
पुर्नरचना, परिषदेवर अध्यक्षांची नेमणूक.

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : मरास-२०१५/प्र.क्र. ७/२२-स**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- ७ मार्च, २०१५

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम, १९६० च्या कलम १५४ (क) मधील तरतूदीनुसार प्राप्त झालेल्या अधिकाराचा वापर करुन शासन निर्णय क्र.मरास-२०१५/प्र.क्र.७/२२-स, दि.२१ फेब्रुवारी, २०१५ च्या शासन निर्णयान्वये महाराष्ट्र सहकारी परिषदेवर (महाराष्ट्र स्टेट को-ऑप. कौन्सिल) श्री. शेखर चरेगावकर यांची अध्यक्ष म्हणून ३ वर्षाकरिता नेमणूक करण्यात आली आहे.

महाराष्ट्र राज्य सहकार परिषदेची कार्ये महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम, १९६० च्या कलम १५४ (क) (३) मधील तरतूदीनुसार विहित केल्याप्रमाणे आहेत.

श्री.शेखर चरेगावकर, अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य सहकारी परिषद यांना या शासन निर्णयान्वये राज्यमंत्री पदाचा दर्जा देण्यात येत आहे. राज्यमंत्री पदास अनुज्ञेय असलेल्या सर्व सोयीसुविधा त्यांना देय राहतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०१५०३०७१३२९२५८३०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने ,

Kavita Kishor Parkar

Digitally signed by Kavita Kishor Parkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Joint Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Kavita Kishor Parkar
Date: 2015.03.07 13:39:17 +05'30'

**( क. कि. पारकर )**
सह सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रत :-**

१) मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
२) मा. मंत्री (सहकार), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाम, मंत्रालय, मुंबई.
३) मा. राज्यमंत्री (सहकार), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाम, मंत्रालय, मुंबई.
४) श्री. शेखर चरेगावकर, अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य सहकारी परिषद,
५) प्रधान सचिव (सहकार) , सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाम, मंत्रालय, मुंबई.
६) अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
७) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.
८) साखर आयुक्त, साखर आयुक्तालय, शिवाजीनगर, पुणे.
९) निवड नस्ती.